**मौजे खटाव, ता. पलुस, जि. सांगली येथे तलाठी चावडी तथा निवासस्थानाच्या बांधकामाच्या नियोजित जागेत बदल करण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.....**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीएलडी-३६१३/प्र.क्र.२६७/ई-८,**
३२ वा मजला, सेंटर क्र.१ इमारत, जागतिक व्यापार केंद्र,
कफ परेड,कुलाबा, मुंबई-४०० ००५.
दिनांक :-१६/०८/२०१४.

**वाचा:-**

१) जिल्हाधिकारी, सांगली यांचे पत्र क्रमांक साशा-१/का-४/प्रशा/आरआर/१२१२/२०१३, दिनांक २३/१०/२०१३.
२) समक्रमांकाचा दिनांक ११/११/२०१३ चा शासन निर्णय.
३) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मिरज यांचे क्र. प्रकल्प/इमा/ ५८०३/ २०१४, दिनांक २८/०७/२०१४ चे पत्र.

**शासन निर्णय:-**

मौजे खटाव, ता. पलुस, जि. सांगली येथे तलाठी चावडी तथा निवासस्थानाच्या बांधकामाच्या रुपये २३,२७,६००/- (अक्षरी रुपये तेवीस लक्ष सत्तावीस हजार सहाशे फक्त ) एवढ्या रकमेच्या अंदाजपत्रकास व नकाशास अटी व शर्तीसह संदर्भाधीन दि.११/११/२०१३ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली होती. तथापि, प्रशासकीय मान्यता बांधकामाच्या ठिकाणी प्राप्त गाव नमुना क्र.७, ७अ व १२ प्रमाणे गट क्र.१५, हिस्सा क्र.२/१० या जागेमध्ये पुराचे पाणी येत असल्याने आणि लगतच मागासवर्गीय समाजाची स्मशानभुमी असल्याने त्या जागेत तलाठी चावडी तथा निवासस्थानाचे बांधकाम करण्यास गावक-यांनी विरोध केला असल्यामुळे आता गाव नमुना क्र.८ प्रमाणे मिळकत क्र.२९० मध्ये सदर बांधकाम करण्याच्या अंदाजपत्रकिय खर्चास मान्यता प्राप्त रकमेच्या व मंजुर जोता क्षेत्रफळाच्या अधिन राहून जागा व नकाशा बदलास शासन प्रशासकीय मंजुरी देत आहे. महसूल व वन विभागाच्या शासन निर्णय दि.११/११/२०१३ मधील अटी व शर्ती त्याच राहतील.

२. प्रस्तावित बांधकामावरील खर्च "४०५९-सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च- ०१ कार्यालयीन इमारती-१०१ बांधकाम पंचवार्षिक योजनाअंतर्गत योजना जिल्हा प्रशासन-मागणी क्रमांक

एच-८" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सार्वजनिक बांधकाम विभागास उक्त लेखाशिर्षाखाली मंजूर केलेल्या अनुदानातुन भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक वि.अ.प्र./१००८/प्रक्र-७०/२००८/विनियम, दिनांक १५/५/२००९ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या शक्तीचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८१६१३४२०७९४१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Chandrakant Nivrutti Padale

Digitally signed by Chandrakant Nivrutti Padale
DN: CN = Chandrakant Nivrutti Padale, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST
Date: 2014.08.20 17:00:00 +05'30'

**( चं. नि. पाडळे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१. विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
२. जिल्हाधिकारी, सांगली.
३. प्रधान लेखापाल, महाराष्ट्र १, ( लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई.
४. महालेखापाल, महाराष्ट्र १, (लेखा परिक्षा), मुंबई.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा सांगली.
६. तहसिलदार कार्यालय, पलूस, जिल्हा सांगली.
७. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-३), मंत्रालय, मुंबई-३२.
८. निवड नस्ती, कार्यासन- ई-८, महसूल व वन विभाग, मुंबई-०५.